**महावेध प्रकल्पाची सार्वजनिक - खाजगी भागिदारीतून अंमलबजावणी करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : राकृवि-०६१६/ प्र.क्र. ७४/राकृवियो कक्ष**

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.

दिनांक: - ०८ मार्च, २०१७

**प्रस्तावना :-**

राज्यात सार्वजनिक खाजगी भागीदारीतून प्रत्येक महसूल मंडळ स्तरावर स्वयंचलित हवामान केंद्रांची उभारणी करण्याचा व हवामान विषयक विविध घटकांची दैनंदिन माहिती गोळा करण्याकरिता ‘महावेध प्रकल्प’ राबविण्याचा शासनाचा मानस होता. या प्रकल्पाद्वारे प्राप्त होणाऱ्या हवामान विषयक माहितीचा मुख्यत: पिक विमा योजना तसेच शेतकऱ्यांना कृषी विषयक सल्ला व मार्गदर्शनासाठी, कृषी व हवामान क्षेत्रात संशोधनासाठी, आपत्ती व्यवस्थापनासाठी आणि अन्य क्षेत्रामध्ये उपयोग होऊ शकतो.

कृषी विभागाने माहे डिसेंबर, २०१६ मध्ये महावेध प्रकल्पाची सार्वजनिक खाजगी भागीदारीतून बांधा - मालक व्हा - चालवा (BOO) तत्वावर अंमलबजावणी करण्याकरिता निविदा प्रसिद्ध केली होती. या निविदा प्रक्रियेतून मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा. लि. यांची महावेध प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी सेवा पुरवठादार संस्था (Concessionaire) म्हणून निवड केली आहे. या संस्थेने राज्यात सर्व महसुल मंडळांमध्ये आवश्यकतेनुसार स्वयंचलित हवामान केंद्रांची उभारणी करावयाची आहे आणि तद्नंतर पुढील ७ वर्ष कालावधीकरिता महावेध प्रकल्प स्व-खर्चाने चालवावयाचा आहे तसेच शासनास मोफत हवामान विषयक माहिती पुरवावयाची आहे. अशाप्रकारे, सार्वजनिक खाजगी भागीदारीतून महावेध प्रकल्पाच्या अंमलबजावणीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. महावेध प्रकल्पाची सार्वजनिक खाजगी भागीदारीतून Build - Own - Operate (BOO) तत्वावर अंमलबजावणी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे तसेच, मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा. लि. यांची या प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरिता सेवा पुरवठादार संस्था (Concessionaire) म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

२. महावेध प्रकल्पांतर्गत सर्वसाधारण प्रदेशामध्ये १२ कि.मी. X १२ कि.मी. अंतरावर आणि डोंगराळ प्रदेशामध्ये ५ कि.मी. X ५ कि.मी. अंतरावर एका स्वयंचलित हवामान केंद्राची उभारणी करण्यात यावी.

३. महावेध प्रकल्पांतर्गत शासनाची कोणतीही आर्थिक गुंतवणूक असणार नाही तथापि सर्व महसूली मंडळामध्ये स्वयंचलित हवामान केंद्रांच्या उभारणीकरिता ५ मी. X ७ मी. जागा शासन उपलब्ध करुन देईल. सर्व महसूली मंडळाध्ये प्राधान्याने वनेतर शासकीय जागा उपलब्ध करुन देण्यात येईल आणि ज्या ठिकाणी शासकीय जागा उपलब्ध होणार नाहीत त्या ठिकाणी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या वा अन्य निमशासकीय संस्थांच्या सुयोग्य जागा शासनाकडून उपलब्ध करुन दिल्या जातील. सदर जागांची मालकी (Title) शासनाचीच राहील तथापि, महावेध प्रकल्पांतर्गत स्वयंचलित हवामान केंद्रांच्या उभारणीसाठी सदर जागांचा ताबा प्रकल्प कालावधीपर्यंत मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा. लि. यांना देण्यात यावा.

४. महसूल विभागाच्या शासन निर्णय क्र. जमीन - २०१५/प्र.क्र.४५/ज-१, दि. १ जून, २०१५ नुसार महावेध प्रकल्पांतर्गत प्रत्येक महसूल मंडळामध्ये उभारावयाच्या स्वयंचलित हवामान केंद्रांकरिता संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडून शासकीय जागेचा ताबा घेण्याच्या कार्यवाहीचे राज्य स्तरावरुन आयुक्त (कृषी) यांनी संनियंत्रण करावे. याकामी सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी यांची नोडल अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत असून त्यांनी आपापल्या जिल्हयाच्या जिल्हाधिकाऱ्यांकडे जिल्हयातील सर्व महसूली मंडळांमधील जागा स्वयंचलित हवामान केंद्रांच्या उभारणीकरिता उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव सादर करुन सदर जागांचा ताबा मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा. लि. यांना दयावयाचा आहे.

५. स्वयंचलित हवामान केंद्रांच्या उभारणीकरिता शासनाने जागा हस्तांतरीत केल्याच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या कालावधीत मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा. लि. यांनी स्व-गुंतवणूकीतून हवामान केंद्रांची उभारणी पूर्ण करावयाची आहे. सर्व महसूली मंडळामध्ये हवामान केद्रांची उभारणी पूर्ण झाल्यानंतर त्यांनी ७ वर्ष कालावधीकरिता स्व-खर्चाने प्रकल्प चालवावयाचा आहे तसेच, सर्व हवामान केंद्रांची देखभाल व दुरुस्ती आणि नादुरुस्त अथवा चोरी झालेल्या उपकरणांची बदली करावयाची जबाबदारी मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा.लि. यांची राहील.

६. महावेध प्रकल्पांतर्गत प्रत्येक स्वयंचलित हवामान केंद्रांद्वारे 'तापमान, पर्जन्यमान, सापेक्ष आर्द्रता, वाऱ्याचा वेग आणि दिशा' या हवामान विषयक घटकांची Real time माहितीची प्रती १० मिनिटांनी डेटा लॉगरमध्ये नोंद घ्यावयाची असून सदर नोंदविलेली माहिती दर १ तासाने सर्व्हरला पाठवावयाची आहे. मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा.लि. यांनी सदर हवामान विषयक Real time माहिती शासनास क्लाऊड सर्व्हरवर ७ वर्ष कालावधीकरिता मोफत उपलब्ध करुन दयावयाची आहे.

७. महावेध प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारी हवामान विषयक माहितीचा शासन अर्थसहाय्यीत पिक विमा योजनांकरिता अधिकृत हवामान विषयक माहिती म्हणून उपयोग करण्यात येईल. त्यानुषंगाने या प्रकल्पांतर्गत उभारण्यात येणारी सर्व हवामान केंद्र शासन अर्थसहाय्यीत पिक विमा योजनांकरिता

खरीप व रबी हंगामांकरिता स्वतंत्रपणे रीतसर अधिसूचित करण्यात येतील. त्याचप्रमाणे पिक विमा योजनेंतर्गत सहभागी होणाऱ्या सर्व विमा कंपन्यांना नेमून दिलेल्या विमा क्षेत्रातील (Insurance unit) हवामान केंद्रांची माहिती मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा.लि. यांच्याकडून विहीत दराने खरेदी करणे बंधनकारक राहील.

८. मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा. लि. यांना पिक विमा योजनेंतर्गत विमा कंपन्यांना किमान ६ महिने अथवा त्यापेक्षा जास्त कालावधीच्या हवामान विषयक माहितीची प्रती स्वयंचलित हवामान केंद्र प्रती महिना ₹ ३२५०/- अधिक कर व शुल्क या दरापेक्षा जास्त दराने विक्री करता येणार नाही. सदर मुळ दरामध्ये प्रकल्प कार्यान्वीत झाल्यापासून दर ३ वर्षानंतर १०% पर्यंत वाढ अनुज्ञेय राहील. अशाप्रकारे, ३ वर्षानंतर हवामान विषयक माहिति विक्रीचा कमाल दर ₹ ३५७५/- अधिक कर व शुल्क, आणि ६ वर्षानंतर सदर कमाल विक्री दर ₹ ३९००/- अधिक कर व शुल्क असा राहील. त्याचप्रमाणे, पिक विमा कंपन्यांना ६ महिन्यांपेक्षा कमी कालावधीची Real time हवामान विषयक माहिती हवी असल्यास सदर माहितीच्या विक्रीचा दर ठरविण्याचा अधिकार मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा. लि. यांना राहील.

९. महावेध प्रकल्पांतर्गत शासनास दैनंदिनरित्या मोफत प्राप्त होणाऱ्या Real time हवामान विषयक माहितीचा राज्य शासन जनहितार्थ (Public good) उपयोग करु शकेल तसेच ही माहिती केंद्र अथवा राज्य शासनाच्या अन्य विभागांना / अधिनस्त शासकीय संस्थांना नि:शुल्क उपलब्ध करुन देण्याची मुभा राहील. त्यानुसार सदर माहिती आधारे केंद्र अथवा राज्य शासनाच्या अधिनस्त संस्थांच्या / विद्यापीठांच्या अथवा खाजगी संस्थांच्या मदतीने राज्य शासनाकडे संपूर्ण स्वामित्व हक्क असणारी उत्पादने राज्य शासन विकसीत करु शकेल तथापि, अशा उत्पादनांचा शासन वाणिज्यिक उपयोग (Data Monetization) करणार नाही. त्याचप्रमाणे, या प्रकल्पांतर्गत Real time हवामान विषयक माहिती प्राप्त झाल्यापासून ३६५ दिवसानंतर सार्वजनिकरित्या प्रसिद्ध करण्याची शासनास मुभा राहील.

१०. शासन Real time हवामान विषयक माहिती केंद्र अथवा राज्य शासनाच्या अधिनस्त संस्थांना / विद्यापीठांना संशोधन कार्यासाठी नि:शुल्क उपलब्ध करुन देऊ शकेल तथापि, या संस्था सदर माहिती आधारे व्यावसायीक उत्पादनांची निर्मिती करुन Real time हवामान विषयक माहितीचा वाणिज्यिक प्रयोजनासाठी (Data Monetization) उपयोग करणार असल्यास त्यांना अशा सर्व प्रयोजनांसाठी मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा. लि. यांच्याकडून सदर माहिती खरेदी करावी लागेल.

११. परिच्छेद क्र. ९ व १० मधील प्रयोजनांचा अपवाद वगळता कोणत्याही केंद्र वा राज्य शासनाच्या विभागास / अधिनस्त शासकीय संस्थांना वाणिज्यिक प्रयोजनासाठी Real time हवामान विषयक माहिती हवी असल्यास सदर माहितीच्या विक्रीचा दर ठरविण्याचा अधिकार मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा. लि. यांना राहील. त्याचप्रमाणे, कोणत्याही त्रयस्थ संस्थेस Real time हवामान विषयक माहिती उपलब्ध करुन देतेवेळी सदर माहिती शासनाच्या (कृषी विभाग, महाराष्ट्र शासन) व मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा. लि. यांच्या संयुक्त नावासह ( Acknowledgement) देण्यात यावी.

१२.मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा. लि. यांनी महावेध प्रकल्पाकरिता शासनाकडे रुपये दोन कोटी रकमेची परफॉर्मन्स बँक गॅरंटी जमा केलेली आहे. महोवध प्रकल्पाच्या निविदेतील तरतूदीनुसार, जागा हस्तांतरीत केल्याच्या दिनांकापासून ६ महिन्यांच्या आत मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा. लि. यांनी सर्व स्वयंचलित हवामान केंद्रांची उभारणी पूर्ण करुन प्रकल्प कार्यान्वीत केल्यास सदर बँक गॅरंटी रुपये एक कोटी रकमेपर्यंत कमी करण्यास शासन यथावकाश मान्यता देईल.

१३.महावेध प्रकल्प कार्यान्वीत झाल्यापासून ७ वर्ष कालावधी पूर्ण झाल्यानंतर सदर प्रकल्प चालविण्यास मुदतवाढ देणे अथवा यथास्थिती नवीन निविदा जारी करणे याबाबत शासनाचा निर्णय अंतीम राहील.

१४.प्रकल्पाचा ७ वर्षांचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा. लि. यांनी सर्व स्वयंचलित हवामान केंद्रांचा ताबा शासनाकडे सोपवावयाचा आहे. सदर हवामान केंद्रांवरील उपकरणे, डेटा लॉगर, सेन्सर्स, सोलार पॅनल, बॅटरी व संबंधित वायरींग मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा. लि. घेऊन जाऊ शकतील तथापि प्रकल्प स्थळांवरील कुंपण, फाऊंडेशन व अन्य स्थापत्य कामे शासन मालकीची राहतील.

१५.महावेध प्रकल्पाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने महत्वपूर्ण बाबींचा थोडक्यात उल्लेख या शासन निर्णयामध्ये करण्यात आला असून या प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरिता शासनाने व मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा. लि. यांनी दि. १५/०२/२०१७ रोजी केलेल्या करारानाम्यात उक्त बाबींविषयी तसेच अन्य तरतुदींचे विस्तृत विवेचन केलेले आहे. सबब, महावेध प्रकल्पाची अंमलबजावणी सदर करारनाम्यातील तरतूदींनुसारच करण्यात येईल आणि सदर करारनामा सर्व कायदेशीर बाबींसाठी अंतीम गृहीत धरण्यात येईल.

१६.महावेध प्रकल्पांतर्गत महसूल मंडळ स्तरावर शासकीय जागा उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने महसूल विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२२५८२, दि. ०३ फेब्रुवारी, २०१७ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार सदर शासन निर्णयांन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३०८१२५८४३३१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2017.03.08 12:58:48 +05'30'

**( श्रीकांत चं. आंडगे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री मंत्रालय, मुंबई

२. मा. मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
३. मा. राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव
४. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
५. अ.मु.स. (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अ.मु.स. (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्र. स. (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषी संजीवनी प्रकल्प, मुंबई
९. सर्व विभागीय आयुक्त
१०.आयुक्त (कृषी), महाराष्ट्र राज्य, पुणे
११.सर्व जिल्हाधिकारी
१२.सर्व उपसचिव (कृषी), कृषी, पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४.सर्व संचालक / कृषी सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५.सर्व विभागीय कृषी सहसंचालक
१६.सर्व जिल्ह्यांचे जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी.
१७.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८. महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१९.महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
२०.मुख्य कार्यकारी अधिकारी, मे. स्कायमेट वेदर सर्व्हिसेस प्रा. लि., जी.वाय.एस. हाईट्स, सेक्टर १२५, नोएडा
२१.निवड नस्ती (कार्यासन राकृवियो).